## .. विठ्ठलाची आरती ..

युगे अठ्ठाविस विटेवरी उभा वामांगी रखुमाई दिसे भव्य शोभा
पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आले गा चरणी वाहे भीमा उद्धरी जगा...1

जय देव जय देव जय पांडुरंगा रखुमाई वल्लभा राईच्या वल्लभा पावे जिवलगा .. जय देव जय देव ..धृ..

तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटी कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटि
देव सुरवर नित्य येती भेटी गरूड हनुमंत पुढे उभे राहती...2
.. जय देव जय देव जय पांडुरंगा... ..

धन्य वेणूनाद अणूक्षेत्रपाला सुवर्णाची कमळे वनमाळा गल
राई रखुमाई राणीया सकळा ओवळीती राज विठोबा सांवळा...3
.. जय देव जय देव जय पांडुरंगा... ..

ओवाळू आरत्या कुर्वंडया येती चंद्रभागेमाजी सोडुनिया देती
दिंडया पताका वैष्णव नाचती पंढरीचा महिमा वर्णावा किती...4
.. जय देव जय देव जय पांडुरंगा... ..

आषाढी कार्तिकी भक्तजन येती चंद्रभागेमध्ये स्नान जे करिती
दर्शनहेळामात्रे तयां होय मुक्ती केशवासी नामदेव भावे ओवाळीती...5
.. जय देव जय देव जय पांडुरंगा... ..